कोषागारातून रोख देय अनुदान
राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र
हिश्श्याचे अनुदान वितरीत
करण्याबाबत...(२२१५ ९७९१)

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१६ /प्र.क्र.४४ /पा.पु.१०

सातवा मजला ,गोकूळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई ४०० ००१
तारीख: २२ मार्च, २०१७

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ) /पापु-७, दिनांक १७ मार्च २०१०**
2) **शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४ /प्र.क्र. ५२ /पापु-७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४**

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण घटकाचा रू. ५९.७३३४ कोटी एवढा निधी कव्हरेज व गुणवत्ताबाधित,देखभाल व दुरूस्ती या घटकाच्या प्रगतीपथावरील पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी लेखाशीर्ष २२१५ ९७९१ याखाली संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

यासंदर्भात केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण घटकाचा रू. ५९.७३३४ कोटी ( एकोणसाठ कोटी त्र्याहत्तर लक्ष चौतीस हजार मात्र) एवढा निधी कव्हरेज व गुणवत्ताबाधित,देखभाल व दुरूस्ती या घटकाच्या प्रगतीपथावरील पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी लेखाशीर्ष २२१५ ९७९१ याखाली संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर ( BEAMS ) मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी -**

१. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत कव्हरेज व गुणवत्ताबाधीत तसेच देखभाल व दुरूस्तीच्या सर्वसाधारण घटकाच्या निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे अशा , भौतिक दृष्ट्या पूर्णत्वाकडे आलेल्या गावे/वाड्यांमधील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे. तसेच सदर अनुदान भौतिक दृष्ट्या पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण गावे/वाड्या

फ्लोराईड/आर्सेनिक, संसद आदर्श ग्राम, हागणदारीमुक्त गावे/वाड्यातील योजना पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे.

२. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परीक्षणाकरिता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३. शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त, (विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत देखभाल व दुरूस्ती याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे

५. केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता ,IMIS या प्रणालीवर पुढील प्रमाणे नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात .

क. भौतिक दृष्ट्या १००% पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण योजना.

ख. >७५ ते <१००% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

ग. >५० ते <७५% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

घ. >२५ ते <५०% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

६. सर्वसाधारण घटकांतर्गत उपलब्ध करून दिलेली सन २०१२-१३,२०१३-१४,२०१४-१५ आणि २०१६-१७ या वर्षांच्या सर्वसाधारण घटकाच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत .

७. सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधीकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रू. २३.८०९५ कोटी (रू. तेवीस कोटी ऐंशी लक्ष पंच्याण्णव हजार मात्र ) महाराष्ट्र जीवन प्राधीकरणाचे संचालक,(वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव ,पाणी व स्वच्छता विभाग (श्री. रूचेश जयवंशी ) यांनी प्रतिस्वक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय , मुंबई यांना सादर

करण्यात यावे. संचालक,(वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधीकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. रूचेश जयवंशी ) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधीकरण यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. २०/०४/२०१६ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दि. २०/०४/२०१६ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ३ व ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे. उपरोक्त रू. ५९.७३३४ कोटी एवढा केंद्र निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबद्दलची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२२१४५८४०३६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.22 16:24:34 +05'30'

(सुनिल तुमराम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय ,मुंबई.
नियोजन विभाग (कार्यासन -१४४३)/वित्त विभाग(व्यय-३),मंत्रालय,मुंबई.
सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषदा
मुख्य लेखा व वित्त अधिकारी संबंधित,जिल्हा परिषदा
उपमुख्य कार्यकारी अधिकारी संबंधित (पाणी व स्वच्छता)जिल्हा परिषदा

संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
संचालक(वित्त),महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, सर्व जिल्हा परिषदा
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी .
अधिदान व लेखा अधिकारी ,मंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती कार्यासन पापु-१०.

**विवरणपत्र**

| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१६/प्र.क्र.४४ / पापु-१०, दिनांक : **२२** मार्च २०१७ चे सहपत्र | | | | |
|---|---|---|---|---|
| **ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) (सर्वसाधारण घटक)** (लेखाशिर्ष २२१५ ९७९१) (रूपये लाखात) | | | | |
| **अ.क्र.** | **अंमलबजावणी यंत्रणेचे नाव** | **घटक** | | **एकूण वितरीत रक्कम** |
| | | कव्हरेज व गुणवत्ताबाधीत | देखभाल व दुरूस्ती | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | महाराष्ट्र जीवन प्राधीकरण,मुंबई | २१००.०० | २८०.९५ | २३८०.९५ |
| २ | जिल्हा परिषद, ठाणे | ०.०० | ६.०० | ६.०० |
| ३ | जिल्हा परिषद, रायगड | २७७.३९ | ९.०० | २८६.३९ |
| ४ | जिल्हा परिषद, रत्नागिरी | ४००.०० | १३.०० | ४१३.०० |
| ५ | जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग | ०.०० | ९.०० | ९.०० |
| ६ | जिल्हा परिषद, पालघर | ०.०० | ७.०० | ७.०० |
| ७ | जिल्हा परिषद, पुणे | ३००.०० | १०२.०० | ४०२.०० |
| ८ | जिल्हा परिषद, सातारा | ०.० | २०.०० | २०.०० |
| ९ | जिल्हा परिषद, सांगली | ४०.०० | ५५.०० | ९५.०० |
| १० | जिल्हा परिषद, सोलापूर | १५०.०० | ३१.०० | १८१.०० |
| ११ | जिल्हा परिषद, कोल्हापूर | ३००.०० | ३३.०० | ३३३.०० |
| १२ | जिल्हा परिषद, नाशिक | १००.०० | २५.०० | १२५.०० |
| १३ | जिल्हा परिषद, धुळे | ३०.०० | ०.०० | ३०.०० |
| १४ | जिल्हा परिषद, नंदूरबार | ४०.०० | ०.०० | ४०.०० |
| १५ | जिल्हा परिषद,जळगाव | १५०.०० | १९.०० | १६९.०० |
| १६ | जिल्हा परिषद, अहमदनगर | ०.०० | २७.०० | २७.०० |
| १७ | जिल्हा परिषद, औरंगाबाद | ४०.०० | २३.०० | ६३.०० |
| १८ | जिल्हा परिषद,जालना | १३०.०० | २१.०० | १५१.०० |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.22 16:25:06 +05'30'

(सुनिल तुमराम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

## विवरणपत्र

| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नाव | घटक | | एकूण वितरीत रक्कम |
|---|---|---|---|---|
| | | कव्हरेज व गुणवत्ताबाधीत | देखभाल व दुरूस्ती | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १९ | जिल्हा परिषद, परभणी | ५०.०० | ०.०० | ५०.०० |
| २० | जिल्हा परिषद, हिंगोली | ०.०० | १४.०० | १४.०० |
| २१ | जिल्हा परिषद, नांदेड | ५०.०० | २४.०० | ७४.०० |
| २२ | जिल्हा परिषद, उस्मनाबाद | १००.०० | ११.०० | १११.०० |
| २३ | जिल्हा परिषद, बीड | १००.०० | २६.०० | १२६.०० |
| २४ | जिल्हा परिषद, लातूर | ५०.०० | १७.०० | ६७.०० |
| २५ | जिल्हा परिषद, अमरावती | ५०.०० | ८.०० | ५८.०० |
| २६ | जिल्हा परिषद, अकोला | ०.०० | ८.०० | ८.०० |
| २७ | जिल्हा परिषद, बुलडाणा | २७०.०० | २०.०० | २९०.०० |
| २८ | जिल्हा परिषद, यवतमाळ | ०.०० | ७.०० | ७.०० |
| २९ | जिल्हा परिषद, नागपूर | २००.०० | २४.०० | २२४.०० |
| ३० | जिल्हा परिषद, वर्धा | ०.०० | ५.०० | ५.०० |
| ३१ | जिल्हा परिषद, भंडारा | ५०.०० | ९.०० | ५९.०० |
| ३२ | जिल्हा परिषद,गोंदिया | १००.०० | १३.०० | ११३.०० |
| ३३ | जिल्हा परिषद,चंद्रपूर | ०.०० | १७.०० | १७.०० |
| ३४ | जिल्हा परिषद,गडचिरोली | ०.०० | १२.०० | १२.०० |
| एकूण | | ५०७७.३९ | ८९५.९५ | ५९७३.३४ |
| ( रूपये एकोणसाठ कोटी त्र्याहत्तर लक्ष चौतीस हजार फक्त ) | | | | |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.22 16:25:30 +05'30'

(सुनिल तुमराम)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन